**महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीच्या कार्यक्रम आयोजनाच्या खर्चास वित्तीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र.हिंसाअ ७०२४(११)/प्र.क्र.१८३(८०८५९८)/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २७ मार्च, २०२५

**संदर्भ** :-१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. हिंसाअ ७०१९(१४)/प्र.क्र.१८८/सां.का.४, दि. १८ सप्टेंबर, २०१९.
२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. समक्रमांक, दि. १८ जुलै, २०२४.
३) सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी यांचे पत्र क्र. मराहिंसाअ/७६५-७६६ /२०२५, दि. २६ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

राज्यामध्ये हिंदी भाषा आणि साहित्याच्या विकासासाठी महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी कार्यरत असून या अकादमीद्वारे राज्यात हिंदी भाषा आणि साहित्याचे संवर्धन आणि विकास या संबंधी विविध उपक्रम राबविण्यात येतात. उपर्निर्दिष्ट क्र.१ अन्वये महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीच्या योजनांची नियमावली निश्चित करण्यात आलेली आहे. उपर्निर्दिष्ट क्र.२ अन्वये महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीस सांस्कृतिक कार्यक्रम घेण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता त्यातील काही सांस्कृतिक कार्यक्रम संपन्न झालेले आहेत. सदरील सांस्कृतिक कार्यक्रमाच्या रकमेस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमीमार्फत आयोजित कार्यक्रम व त्यावरील खर्च रु.३,२९,८५२/- (अक्षरी रुपये तीन लक्ष एकोणतीस हजार आठशे बावन्न फक्त) इतक्या रकमेस खालील तपशीलानुसार या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**संपन्न कार्यक्रमांचा प्रत्यक्ष खर्चाचा तपशील**

| अ | साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रम | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र. | कार्यक्रम | संपन्न दिनांक | ठिकाण | प्रत्यक्ष खर्च |
| १ | कवि सम्मेलन | १६ मार्च, २०२५ | भायंदर | १,१८,७६० |
| २ | हिंदी दिवस | १८ व १९ मार्च, २०२५ | बिर्ला कॉलेज, कल्याण | १,२०,००० |
| ब | कार्यशाळा | | | |
| १ | हिंदी, मराठी, अंग्रेजी पारपास्परिक अनुवाद कार्यशाळा | ०७ मार्च, २०२५ | फर्ग्युसन महाविद्यालय | ९१,०९२ |
| | **एकूण** | | | **३,२९,८५२** |

**०२.** सदर खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडडी-२ (०८) हिंदी साहित्य अकादमी, (०८) (०१) हिंदी साहित्य अकादमीची आस्थापना (कार्यक्रम), (२२०५ १६८८) ५०-इतर खर्च या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून मंजूर करण्यात येत आहे.

**०३.** यासाठी, सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी यांना नियंत्रण अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**०४.** सदर खर्चास वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनिमय, भाग-२, दि.१७ एप्रिल, २०१५, उपविभाग ३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७(२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सहसंचालक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, मुंबई यांची राहील.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२७१५५७४५९१२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.27 15:59:10 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. मंत्री ( सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. सह संचालक, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती साहित्य अकादमी, ओल्ड कस्टम हाऊस, विकास विभाग इमारत, शहिद भगतसिंग मार्ग, मुंबई ४०० ००१.
५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४.